**राष्ट्रध्वजाच्या उचित सन्मानाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रिट याचिका-०११२/२८७/प्र.क्र.७८/विशा-१अ**
२रा मजला, मंत्रालय (मुख्य इमारत),
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १३ ऑगस्ट, २०१५

वाचा -

१) या विभागाचे परिपत्रक क्र. ०३१३/७१४/प्र.क्र.६२/विशा १ अ, दि. १४.६.२०१४.
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१४/(१००/१४)/ समन्वय कक्ष, दि.२२.०९.२०१४.
३) उच्च व तंत्रशिक्षण विभागाचे शासन परिपत्रक क्र.याचिका-२२१२/(प्र.क्र.७९/२०१४)/ समन्वय, दि.२३.०९.२०१४.
४) ग्राम विकास व जलसंधारण विभागाचे शासन परिपत्रक क्र.रिटपी-२६१३/प्र.क्र.८६/ पंरा-४, दि.२६.११.२०१४
५) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे शासन परिपत्रक क्र.याचिका-६११४/प्र.क्र.१६७/ एस.डी.-१, दि.०५.१२.२०१४
६) उच्च व तंत्र शिक्षण विभागाचे शासन परिपत्रक क्र.याचिका-२२१२/(प्र.क्र.७९/२०१४)/ समन्वय, दि.०८.१२.२०१४
७) या विभागाचे समक्रमांकाचे दि. ०१.०१.२०१५ चे शासन परिपत्रक
८) या विभागाचे समक्रमांकाचे दि. २२.०४.२०१५ चे शासन परिपत्रक

प्रस्तावना -

दरवर्षी २६ जानेवारी व १५ ऑगस्ट राष्ट्रीय सणांच्या दिवशी, १ मे या महाराष्ट्र दिनाच्या दिवशी तसेच इतर महत्वाच्या कार्यक्रमांच्या व क्रीडा आयोजनांच्या दिवशी लहान आकारातील कागदी व प्लास्टिकच्या राष्ट्रध्वजांची विक्री मोठ्या प्रमाणात होत असते. शालेय विद्यार्थी व लहान मुले यांच्यासह अनेक व्यक्ती राष्ट्रभक्ती व उत्साहापोटी हे राष्ट्रध्वज विकत घेत असतात. हे ध्वज त्याच दिवशी सायंकाळी अथवा दुसऱ्या दिवशी इतस्तत: टाकले जातात. त्यामुळे राष्ट्रध्वजाचा अवमान होतो. सदर कृतीस लोकसहभागाच्या माध्यमातून आळा बसावा यासाठी संदर्भाधीन परिपत्रके निर्गमित करण्यात आली आहेत. त्यानुसार प्लास्टिकच्या राष्ट्रध्वजांचा वापर थांबविण्यासाठी तालुका व जिल्हा स्तरावर समित्या स्थापन करण्यात आल्या आहेत. अशासकीय संस्था व इतर संघटनांच्या मदतीने इतस्तत: पडलेले राष्ट्रध्वज गोळा करण्याची कार्यवाही करण्यात येत असते. तथापि, ग्रामपंचायत, नगरपरिषद व महानगरपालिका स्तरावर राष्ट्रध्वजाच्या संकलनासाठी उचित यंत्रणा निर्माण करणे शासनाच्या विचाराधिन होते.

**शासन निर्णय -**

रस्त्यावर इतस्तत: पडलेल्या, खराब झालेल्या व फाटलेल्या राष्ट्रध्वजांचे संकलन करुन राष्ट्रध्वज संहितेमध्ये नमुद कार्यपध्दतीनुसार नष्ट करण्यासाठी खालीलप्रमाणे समित्या स्थापन करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी आपल्या जिल्ह्यात मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद व आयुक्त, महानगरपालिका यांच्या सहाय्याने समित्या स्थापन कराव्यात.

**१) ग्रामपंचायत स्तरावर :**

i) ग्रामसेवक - अध्यक्ष

ii) गावातील शाळांचे मुख्याध्यापक -सदस्य

iii) गावातील पोलीस पाटील - सदस्य

२) **नगरपरिषद व नगरपंचायत स्तरावर :**

i) मुख्याधिकारी - अध्यक्ष

ii) नगरातील शाळांचे मुख्याध्यापक - सदस्य

ii) संबंधित पोलीस ठाण्याचा वरिष्ठ पोलीस निरीक्षक किंवा त्यांचा प्रतिनिधी - सदस्य

३) **महानगरपालिका स्तरावर प्रभागनिहाय समित्या :**

i) प्रभाग अधिकारी - अध्यक्ष

ii) प्रभागातील शाळांचे मुख्याध्यापक - सदस्य

iii) संबंधित पोलीस ठाण्यांचे वरिष्ठ पोलीस निरीक्षक अथवा त्यांचा प्रतिनिधी - सदस्य

उपरोक्त समित्यांनी विद्यार्थी, युवक मंडळे, क्रीडा मंडळे, महिला मंडळे, अशासकीय संस्था तसेच सदर काम करण्यास स्वखुशीने तयार असलेल्या संस्था व मंडळे यांच्या मदतीने रस्त्यावर इतस्तत: पडलेले, खराब झालेले व फाटलेले राष्ट्रध्वज संकलित करावेत. तसेच कोणत्याही संस्थेने किंवा व्यक्तीने स्वत:हून गोळा केलेले राष्ट्रध्वज उपरोक्त समित्यांकडे दिल्यास ते स्वीकारण्यात यावेत. अशा प्रकारे संकलित केलेल्या खराब व फाटलेल्या राष्ट्रध्वजांची विल्हेवाट उपरोक्त समित्यांनी वाचा क्र. ७ येथील शासन परिपत्रकातील नमुद ध्वजसंहितेतील तरतुदींनुसार करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०८१२१०५३२५९६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kailas Arjun Gaikwad

Digitally signed by Kailas Arjun Gaikwad
DN: CN = Kailas Arjun Gaikwad, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.08.13 13:19:32 +05'30'

**( कैलास अ. गायकवाड )**
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा. मंत्री, मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व).
४. मा. विधानसभा / विधानपरिषद सदस्य (सर्व).
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मुंबई.
७. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई
८. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय.
११. आयुक्त, महानगरपालिका (सर्व).
१२. विभागीय आयुक्त (सर्व).
१३. जिल्हाधिकारी तथा जिल्हादंडाधिकारी ( सर्व ).
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ( सर्व ).
१५. पोलीस आयुक्त ( सर्व ).
१६. परिक्षेत्रीय विशेष पोलीस महानिरीक्षक ( सर्व ).
१७. जिल्हा पोलीस अधीक्षक (सर्व).

१८. जिल्हा माहिती अधिकारी (सर्व).

१९. प्रबंधक, मूळ शाखा उच्च न्यायालय, मुंबई ( पत्राने ).

२०. प्रबंधक अपील शाखा उच्च न्यायालय, मुंबई ( पत्राने ).

२१. मुख्याधिकारी, नगरपरिषद ( सर्व ).

२२. ग्रामसेवक, ग्रामपंचायत ( सर्व )

२३. निवड नस्ती, कार्यासन विशा-१अ, गृह विभाग.